मुंबई इलाखा व व्हाडमध्यप्रांत शाळाखात्यांनीं बक्षिसांसाठीं व लायब्ऱ्यांसाठीं मंजूर केलेलें पुस्तक.

बालसन्मित्र—पुस्तकमाला.

पुस्तक सव्विसावें.

# शेवटीं सत्याचा जय.

[ एक अंकी नाटक ]





लेखक व प्रकाशक

पारुजी नारायण मिसाळ, मालवण.

नोवेंबर १९३०

कि[illegible]न आणे.

# मालेविषयीं कांहीं अभिप्राय.



**प्रो. नारायण केशव बेहेरे, एम्. ए. नागपूर—**" प्रतिकूल परिस्थिति असतांना, दृष्टीआड राहून बालसृष्टि नव्यानें घडविण्याचा आपला सतत चाल- लेला उद्योग पाहिला म्हणजे मनाला विस्मय व आदर वाटतो. आपल्या दीर्घो- द्योगाबद्दल आपलें ... अभि[ ]दन करावें तितकें थोडेंच ... ."

**श्री. य... ...क्ष्मण गण्ये, बी. ए. ... एल ..., वर्धा—** मी बाल- सन्मित्रमा... ... ... ...ीं. मु ... ... ... सहज समज- तील अशा ... ... ... ...ध्या ... ... ...र यांतील गोष्टी असल्यामु... ... ...कांनीं मुलांच्या ... ... ... योग्य आहेत. किंमती ... ... सर्वां... आक... द... ... ...ला आहे.

**नव ...** ... ...मराठी भा... ... ... व इतर पुस्तकें यांच्यामध्यें ... ... ...न प्रसिद्ध हो... ... ... नंबर बराच वर लागेल. बाल... ... ... ...क के. रा. ... ... ...ाणें सोपी भाषा लिहिण्याची ह...टी ... ...ड याना चांगली ... ...या पुस्तकांतून लहान मुलांचें ... ... त्यां ... ... ... ही प्राप्त होईल. प्रत्येक आईबापां... ... ... ... मुलांस ... ...स द्यावीं.

**हिंदु—** ... ... ... सोपी ... ... वाचनाची गोडी लावणें, त्यां... ...रंजन ... ...बरच त... ... ... देणें असें तिहेरी कार्य साध... ...मु... ...क ... ... ...ा मुलाबाळांच्या हातांत देण्या... ... .

**विकास—** ... मालेंत कोणतेंही पुस्तक प्रसिद्ध झाल्याबरोबर तें सर्व वाच- नालयाकरितां बिनदिक्कत घ्यावें अशा प्रकारची ही माला आहे. संपादक रा. पा. ना. मिसाळ यांची विषयाची चांगली निवड आणि सुबोध भाषा याकरितां जी प्रसिद्धि आहे ती सर्व पुस्तकांतही अनुभवास येते.

# शेवटीं सत्याचा जय !

[ एक अंकी नाटक ]

## प्रवेश १ ला.

[ सुमति आणि धनपाल. ]

**सुमति**—बाबा, आज सफरीला जाण्याची तयारी झाली आहे. ज तयार आहे. मी तिकडेच निघालों, आपली आज्ञा घेण्या- इकडे आलों आहें.

**धनपाल**—माझें म्हातारपण झालें. तूं आतां चांगला समजूत- झाला आहेस; आपलें हिताहित कशांत आहे हें कळण्याजोगें त्रय आहे, म्हणून मी तुला आपल्या व्यापारधंद्या घातलें, तुला कांहींच कळत नाहीं. व्यापारी मनुष्यानें तुझ्यासारखें बुद्धि झाल्यावर त्याचें कल्याण कधींच व्हावयाचें नाहीं, हें त ठेव. पैसा मिळविणें कठिण काम आहे, आणि रखणें त्याहूनही फारच कठिण आहे. हें तुला मुळींच कळत नाहीं. ा पैसे मिळवायला हाडाचीं काडें करावीं लागलीं आहेत, हें तुला ाहीत नाहीं काय? अशा रीतीनें मिळविलेला पैसा तूं उधळून ाकूं लागलास, तर पुढें तुझें होणार तरी कसें? अशा प्रकारची उधळपट्टी करणें, हें आम्हां व्यापाऱ्यांचें लक्षण का रे?

**सुमति**—बाबा, 'उधळपट्टी, उधळपट्टी' असें मला आपण ळीं जें वारंवार म्हणतां, त्याचा अर्थ काय? मी कधीं उधळपट्टी

केल्याचें मला मुळींच आठवत नाहीं. मला कसलें व्यसन नाहीं, अगर निरर्थक कामीं मी एक कवडीही कधीं खर्च करीत नाहीं. तथापि माझ्या हातून जर कांहीं चूक होत असेल, तर आपण मला स्पष्टपणें सांगा, मी ती सुधारण्याचा प्रयत्न करीन.

**धनपाल**—इतके वेळां मी बोललों, पण अजून तें तुझ्या ध्यानांत आलेंच नाहीं का ! अरे, तूं वैश्यपुत्र, तुला पैसा मिळविण्याचा उद्योग करावयाचा आहे, घालवावयाचा नव्हे. मागें सफरीला गेलास त्यावेळीं नेलेल्या धान्याला दुष्काळामुळें चांगला भाव येत असतां, तूं नेलेला माल विकावयाचा सोडून लोकांना तो वाटूनच आलास ! काय तर म्हणे, लोक उपाशी मरत असलेले मला पाहवेनात ! लोक उपाशी मरतात, तर त्याला आपण काय करावयाचें ? आपल्याला आपल्या धंद्यापुरतें काम. जेथें फायदा मिळवावयाचा, तेथें तुझा उदारपणा ! हातांत पैसा असो, जिन्नस असो, कांहीं असो, कोणी गरजू भेटला, कीं तूं आपला द्यायला तयार ! असें वागून तुझा व्यापारधंदा होईल कसा ? पैशाची ही निरर्थक उधळपट्टी नव्हे काय ? तूं स्वतःसाठीं पैसा खर्च करीत नाहींस, हें खरें आहे. पण तुझ्या डोक्यांत हें जें भलतेंच वेड शिरलें आहे तें कांहीं चांगलें नाहीं. हा काय व्यापार ? व्यापाऱ्यांनीं अशा फंदांत पडणें योग्य नाहीं. दुसरी गोष्ट, माल खरेदी करावयाचा असो कीं विकावयाचा असो, तेथें खोटें म्हणून मुळींच बोलायचें नाहीं हा तुझा बाणा ! अशानें का कुठें व्यापार चालतो ? नेहमींच खरें बोलून आपला व्यवहार नीट चालणार नाहीं, आणि आपल्याला यशही मिळणार नाहीं. व्यापार करावयाचा तो नफ्या-

साठीं ! कांहीं तरी मिळवावें यासाठींच व्यापार करावयाचा असतो, हें पक्कें ध्यानांत ठेव आणि यापुढें तरी चांगल्या रीतीनें वाग !

**सुमति**—बाबा, गरीब बिचारीं माणसें दुष्काळांत अन्नावांचून तळमळत होतीं ! त्यांच्या स्थितीकडे पाहून माझें अंतःकरण कळवळलें आणि त्यांचा दुःखभार थोडा तरी हलका करावा, म्हणून मी अन्नसामुग्री वांटून टाकली. अशाच प्रकारें केव्हां तरी दीन दुबळ्या लोकांस मी मदत करितों खरी, पण अशा रीतीनें खर्च झालेला पैसा फुकट गेला, असें मला वाटत नाहीं. दुसरी गोष्ट आपण सांगितली, ती तर माझ्यानें मुळींच होणार नाहीं. प्राण गेला तरी मी असत्य भाषण म्हणून करणार नाहीं. मग क्षुल्लक लाभासाठीं खोटें बोलेन याविषयीं शंकाच नको. क्षमा करा बाबा.

**धनपाल**—तुझ्यासारख्या मूर्ख पोराला उपदेश करून तरी काय उपयोग ? उपड्या घागरीवर पाणी ओतल्याप्रमाणें तो निष्फळच होणार ! मर, काय पाहिजे तें कर ! तुझ्या कपाळीं भिक्षाच लिहिली आहे हें उघड दिसतें. (रागानें निघूनं जातो.)

**सुमति**—( आपल्याशीं ) अरेरे ! बाबांचें मन मोडावें लागतें, ही केवढी दुःखाची गोष्ट आहे ! पण काय ? बाबांच्या उपदेशाप्रमाणें वागावयाचें ? छे, छे, तशा रीतीनें वागलों तर माझ्यावर देवाचा बोल नाहीं का लागणार ? नको, नको, ती गोष्टही मनांत आणणें नको. नुसतें पैसा मिळविणें हेंच का आमचें कर्तव्य ? परमेश्वरा ! माझ्या मनांत कधींही दुर्बुद्धि उत्पन्न होऊं देऊं नको. बाबांच्या मनांत सद्बुद्धि उत्पन्न करून त्यांच्या मनास होत असलेले कष्ट नाहींसे कर !

---

## प्रवेश २ रा.

[ राजा समरसिंह ]

**समरसिंह**--( दुःखानें आपल्याशीं ) हाय! हाय! बाळा विनय-कुमारा! कुठें रे आहेस? माझी एवढी सत्ता, एवढें साम्राज्य, फुकट व्हावें ना? धिक्कार असो मला! ईश्वरा, असा कोणता अन्याय माझे हातून झाला होता, म्हणून हें भयंकर शासन तूं मला केलेंस? प्रत्यक्ष राजवाड्यांत शिरून राणीचा शिरच्छेद करून राजकुमारास आम्हीं घेऊन गेलों, असें पत्रद्वारें कळविणारे निधड्या छातीचे लोक तरी कोण असावे? मला कुठली दुर्बुद्धि सुचली आणि मी शिकारीस निघून गेलों कोण जाणे! देवा, तुझ्या राज्यांत न्याय नाहींच का रे? माझ्या प्रिय पत्नीचा निष्कारण वध व्हावा, आणि माझा एकुलता एक कुलदीपक बाळ विनयही नाहींसा व्हावा, कोण हा भयंकर प्रसंग! अशा वेळींही माझें हृदय दुभंग होऊन जात नाहीं, तेव्हां खरोखरच मी पाषाणहृदयी आहे, असें म्हटलें पाहिजे! माझा एकुलता एक गुणी बाळ गेला, आतां हें राज्य तरी मला काय करावयाचें आहे? आज आठ दिवस मी एकसारखा तळमळत आहें, पण काय उपयोग? माझ्या लाडक्याला आणून भेटविणाऱ्याला अर्धे राज्य देईन, अशी सर्व लोकांत दवंडी पिट-विली, पण त्याचा उपयोग होत नाहीं. माझें सारें सैन्य, सारे लोक, बाळाला धुंडून धुंडून दमले, माझ्या लाडक्यासाठीं त्रिखंड धुंडलें, पण कोठेंच पत्ता नाहीं! अरेरे! बाळा! तूं जिवंत तरी आहेस का रे? येरे! येरे! माझ्या बाळा, मला कडकडून मिठी मारूं दे! नाहीं, नाहींच का रे तूं येत? ( मूर्च्छित पडतो. )

---

## प्रवेश ३ रा.

[ सुमति, मोहन आणि विनयकुमार. ]

**मोहन**—धनीसाहेब, कालच्या खेपेला थोरले धनीसाहेब आपल्यावर फार रागावले म्हणून म्हणत होतां. या खेपेला तरी व्यापारांत नफा मिळवून त्यांचें मन संतुष्ट करूं या; असें येतांना आपण म्हणूनही दाखविलें होतें; पण आपण हें भलतेंच काय करून बसलां? आपल्या जहाजावरील मोत्यें, रत्नें वगैरे सर्व मौल्यवान् माल त्या चोरांच्या हवालीं करून हा कोणाचा मुलगा घेऊन आलां, याला काय म्हणावें? उद्यां घरीं गेल्यावर तुमची व आमची कशी फटफजिती होईल हें उघडच दिसत आहे! तुमच्या भोळेपणाला आणि उदार स्वभावाला हें योग्यच आहे. पण थोडा तरी मागचा पुढचा विचार पाहायला नको काय?

**सुमति**—मोहन, तुझें म्हणणें अगदीं खरें आहे. पण या विनयाचे हाल पाहून मला असें वाटूं लागलें कीं, आपलें सर्वस्व द्यावें आणि ह्याला सोडवून घ्यावें. त्या नराधमांनीं याचे हाल आरंभिले होते ते माझ्यानें पाहावेनात. मागच ते! त्यांना दया ती कसली असणार? आपला माल या सुशील मुलाच्या जिवापेक्षां जास्त मोलाचा का होता? बाबा काय म्हणतील तें म्हणोत, पण मी केलें तें फार चांगलें केलें, असें मला वाटतें.

**मोहन**—बाबा आतां नुसतें बोलूनच निमूट राहतील असें मला वाटत नाहीं. ते या खेपेला तुम्हांला व तुमच्याबरोबर आम्हां साऱ्यांना घरांतून हांकून देतील, असें स्पष्ट चिन्ह मला दिसत आहे!

**सुमति**—मोहन, तूं माझा बालमित्र आहेस. बाबांनीं तुला घरांतून हांकून दिलें तर जिथें मी तिथें तूं.

**मोहन**—तें राहो, पण हा मुलगा कोण, कुठला, याची कांहीं चौकशी तरी तुम्ही केलीत का? त्याचें पुढें करावयाचें काय? याचा नको का विचार करायला? आपलें सर्वस्व तर गमावून बसलांत. आतां पुढील तजवीज तरी पहा.

**सुमति**—या कुमाराच्या नांवापलीकडे त्याची अद्याप मला कांहींच माहिती झालेली नाहीं. पण त्याला पाहतांच हा कोणा थोरामोठ्याचा मुलगा असावा, असें अगदीं उघड दिसतें. आपण त्यालाच विचारूं, म्हणजे समजेल. तो लहान आहे, तरी फार हुशार आहे. बाळा, विनया, इकडे ये.

**विनयकुमार**—काय भाऊ?

**सुमति**—तुझें नांव विनयकुमार म्हणून तूं मला सांगितलेंस, पण तुझे आईबाप कोण? ते राहतात कोठें? तें मला सांग पाहूं?

**विनय**—माझे बाबा किनई समरसिंह महाराज, आणि आई.... माझ्या आईला त्या दुष्टांनीं मारलें हो! तुम्ही आलां नसतां तर मलाही त्यांनीं मारलें असतें! ( रडूं लागतो. )

**सुमति**—उगी रहा बाळ तूं. आतां तुला कोणाचीही भीति नाहीं बरें!

**मोहन**—हा राजपुत्र आहे, हें एका अर्थीं बरें आहे. झाला तर याच्यापासून आपला बराच फायदा होईल, कदाचित् नसतें लचांड उपस्थित होऊन चोरांच्या जागीं आम्हांलाच शिक्षा भोगा-

यची पाळी यावयाची! बरें करितां ब्रह्महत्त्या आपल्या पाठीला लागेल, म्हणून मला भीति वाटते!

**सुमति**—मोहन, तूं किती वेडा आहेस रे! भलत्याच शंका तुझ्या मनांत येतात तरी कशा?

**मोहन**—मी आपला वेडाच आहें. आपला शहाणपणा मात्र आपल्यालाच भोंवला नाहीं म्हणजे झालें!

**सुमति**—अरे, सत्कृत्य कधीं फुकट जात नाहीं. हा त्या साधूंचा उपदेश विसरलास वाटतें!

**मोहन**—महाराज, साधूंचे उपदेश व्यवहारांत थोडेच उपयोगी पडतात! आपण या कामांत जरा संभाळूनच वागा, नाहींतर बरें करितां ब्रह्महत्त्या पाठीस लागावयाची!

---

### प्रवेश ४ था.

[ अजयसिंह आणि तेजसिंह. ]

**अजयसिंह**—( आपल्याशीं ) आज पंधरा दिवस लोटले, तरी अजून राजकुमाराचा पत्ता लागत नाहीं. मी महाराजांसमक्ष प्रतिज्ञा करून निघालों, पण फुकट! किती तरी प्रयत्न केले, पण कुमाराचा मागमूस लागत नाहीं. नानातऱ्हेचे वेष घेऊन माझे लोक तपास करीत फिरताहेत, पण एकाच्याही तोंडून आनंदाचें वर्तमान ऐकावयास मिळत नाहीं. विनयकुमार सांपडतील असें चिह्न मला मुळींच दिसत नाहीं. परत विजयपुरास जावें असें मनांत येतें. पण काय? एवढ्यावरच निराश व्हावयाचें? नुसती नौकरी बजावा-

याची असती तर गोष्ट निराळी होती. पण पुत्राची भेट करून देईल, त्याला अर्धे राज्य देण्याची दवंडी महाराजांनीं पिटविली आहे. त्या आशेनें तर मी कुमाराचा शोध चालविला आहे. मग आतां निराश होऊन अर्ध्या राज्याची आशा सोडावयाची कीं काय ? कोणालाच कुमार सांपडले नाहींत तर ठीकच होईल. पण मला न सांपडतां दुसऱ्या कोणाला ते सांपडून अर्धे राज्य त्याच्या पदरीं पडलें तर मला अतिशय वाईट.वाटेल! कांहीं असो, पण मी निघाल्यापासून मला आपलें वाटत आहे कीं, विजयश्रीची माळ माझ्या गळ्यांत पडून अर्ध्या राज्याचा धनी मीच होणार ! अरे, पण आज तेजासिंह अजून कुठें येत नाहीं तो ! बेट्याला शंभर वर्षांचें आयुष्य आहे ! नांव घेतांच आपला समोर हजर. ( तेजासिंहास ) कसें काय तेजासिंह, काय खबरबात आहे ? आज आपली स्वारी हंसतमुख दिसत आहे, तर कांहीं आहे का आनंदाची बातमी ?

तेजासिंह---( हंसत ) आहे, आनंदाची बातमी आहे! पण आधीं इनाम काय देशील तें सांग. नाहींतर तुझा हिस्सा मी उपटायला तयार आहें. बोल, तुला अर्ध्या राज्याचा मालक केला, तर तूं मला काय देशील ? तूं मला आपला प्रधान करशील कीं नाहीं ? आधीं कबुली देशील, तर पुढें सांगेन.

अजयसिंह---( उत्सुकतेनें ) सांग, सांग तरी अगोदर ! असा संशयांत ठेवूं नको. मी अर्ध्या राज्याचा मालक झाल्यावर तुला प्रधानच काय, पण माझ्या राज्यापैकीं अर्धे राज्यही इनाम करून देईन. हें घे वचन, ( हातावर हात मारतो ) लागला का कुमाराचा पत्ता ?

तेजसिंह—( त्याच्या कानांत सांगतो ) समजलें का ? काम थोडें बिकट आहे.

अजयसिंह—बिकट आहे खरें, पण तें तडीस गेल्यावांचून आपल्याला यश कसें मिळणार ? येथें कांहींतरी युक्तीचाच उपयोग केला पाहिजे. त्या वाण्याच्या पोराला अर्धें राज्य मिळावें आणि आमच्यासारख्या शूर सरदारपुत्रांनीं माशा मारीत बसावें, ही किती बरें लाजिरवाणी गोष्ट आहे !

तेजसिंह—लाजिरवाणी तर खरीच, पण उपाय काय योजावा, हेंच मला सुचत नाहीं.

अजयसिंह—अरे, विचार कसला करायचा आहे ? त्याला जगांतून नाहींसा करून टाकायचा आणि कुमारास घेऊन एकदम विजयपुरास निघून जायचें. दोघां हुषार शिपायांकडे सुमतीला मारण्याचें काम नेमून दे, म्हणजे झालें. त्या शिपायांना थोडी लालूच दाखविली कीं काम फत्ते !

तेजसिंह—पण त्याला त्याच्या लोकांतून काढून कसा आणावयाचा ? दोघे शिपाई तेथें जाऊन काय करितील ?

अजयसिंह—तुला काय त्याचें, मी सारी व्यवस्था करितों. तूं काळजी वाहूं नको. सांगितलेलें काम तूं ताबडतोब बजावून ये. रिकामा वेळ घालवूं नको.

तेजसिंह—बरें जातो तर मी त्याच कामाला. ( जातो. )

अजयसिंह—( आपल्याशीं ) जा, तुला अर्धें राज्यही देतों, प्रधानकी देतों, सारें देतों ! माझें काम मात्र फत्ते होऊं दे. मग बघ कसा तुला हात दाखवितों तो ! खरोखरच आज माझ्या भाग्याचा दिवस उगवला खचित !

## प्रवेश ५ वा.

[ सुमति, मानसिंग आणि किसनसिंग ]

**सुमति**—( सावध होऊन ) या निर्जन रानांत मी कसा येऊन पडलों ? मला स्वप्न तर नाहीं ना पडलें ?

**मानसिंग**—नाहीं, तुला स्वप्न पडलें नाहीं. तुझ्या आयुष्याची मर्यादा मात्र अगदीं संपत आली आहे. तूं आतां फार थोड्या वेळाचा सोबती आहेस. तेव्हां तुला आपल्या देवाचें नांव वगैरे घ्यावयाचें असेल तर घेऊन मरण्यास तयार हो पाहूं !

**सुमति**—( घाबरून ) म्हणजे ? मी कुणाचें काय केलें आहे ? मला मरण्याची शिक्षा कशासाठीं आणि कोणीं दिली ?

**किसनसिंग**—चांडाळा, तुला लाज नाहीं वाटत पुन्हा विचारायला ? तूं आमच्या समरसिंह महाराजांच्या विनयकुमारास चोरून आणलेंस, या तुझ्या भयंकर अपराधाबद्दल तुझा शिरच्छेद करण्याचें शासन आमचे धनीसाहेब सरदार अजयसिंह यांनीं तुला दिलें असून ती कामगिरी त्यांनीं आमचेकडे सोंपविली आहे.

**सुमति**—काय ? कुमाराला मी चोरून आणलें असा माझ्यावर सरदार अजयसिंहांचा आरोप आहे म्हणतां ? आणि त्याबद्दल मला हें शासन ? देवा ! देवा ! खरोखरच तुझ्या राज्यांत न्याय नाहीं का रे ? अपराध कोण करतो, शासन कोण भोगतो, ईश्वरा ! खरोखरच तुझी लीला फार अगाध आहे ! अजयसिंह माझ्याशीं किती गोड बोलत होते आणि त्यांनींच माझा वध करावयास हे मारेकरी पाठवावे ? एक एक ऐकावें तें विचित्रच !

**किसनसिंग**—( एकीकडे मानसिंगास ) मानसिंग, या गृहस्थाला मी पूर्वीं कुठें तरी पाहिल्याचें आठवतें. कुठें आणि केव्हां हें बरोबर आठवत नाहीं, पण पाहिला आहे खास. याच्या चेहऱ्यावर भीतीचें चिन्ह दिसत नाहीं. कुमाराला चोरून नेणारा मनुष्य खरो-खरच हा नसावा, असें मला वाटतें.

**मानसिंग**—याच्या चेहऱ्याकडे पाहिलें म्हणजे मलाही तो अगदीं निरपराधी असावा, असेंच वाटतें.

**किसनसिंग**—आपण त्याचें नांव गांव वगैरे विचारून त्याज-कडून सगळी हकीकत काढून घेऊं. खरोखरच तो अपराधी नसेल, तर एका निरपराधी इसमाच्या हत्येचें भयंकर पाप आपल्या माथ्या-वर निष्कारण बसेल!

**मानसिंग**—( सुमतीस ) का रे! तुझें नांव काय? तूं कुठें राहतोस, काय धंदा करितोस?

**सुमति**—( त्रासानें ) तुम्हांला माझ्या नांवागांवाशीं काय करा-वयाचें आहे? तुमच्या धन्याच्या हुकुमाप्रमाणें माझा शिरच्छेद कर-ण्याचें तुमचें काम आहे, तें तुम्ही उरकून घ्या. मी मरावयास तयार आहें!

**किसनसिंग**—असा कंटाळूं नको. आम्ही तुझ्या हिताकरितांच ही हकीकत तुला विचारीत आहों. आपलें नांवगांव सांगण्यास इतके आढेवेढे तरी तूं कां घ्यावे?

**सुमति**—तुमचा इतका आग्रहच आहे, तर मग नांव सांगा-वयास माझी कांहीं हरकत नाहीं. मी चंपावती येथील धनपाळ नामक श्रीमंत गृहस्थाचा हतभागी पुत्र सुमति आहें.

**किसनसिंग**—काय? आपण सुमति? (पाय धरितो.) माझ्या अपराधाची क्षमा असावी. आपण माझे उपकारकर्ते आहांत. गेल्या दुष्काळांत ज्या हतभागी कुटुंबांना आपण मदत केली, त्यांपैकींच मी एक आहें. आपल्या अन्नावर वाढून आपणावरच तलवार चालवावी इतका निमकहराम मी अझून झालों नाहीं. (तलवार फेकून देतो.) महाराज, माझ्या अपराधांची क्षमा असावी.

**मानसिंग**—महाराज, माझ्या अपराधांची क्षमा असावी. न कळत माझेकडून अन्याय घडला. (पाय धरितो.) आपण माझ्या सारख्या हजारों लोकांवर जे उपकार करून ठेविले आहेत, त्यामुळें इतक्या अल्पवयांत आपली कीर्ति सर्व देशभर गाजत आहे! आपल्या हातून भलतेंच नीच कृत्य होईल असें मला मुळींच वाटत नाहीं.

**सुमति**—अरे, तुम्ही हें काय आरंभिलें आहे? आपलें काम उरकावयाचें सोडून उलट तुम्ही माझी क्षमा मागतां, याचा अर्थ तरी काय?

**मानसिंग, किसनसिंग**—नका महाराज, असें बोलूं नका. आम्हीं आज अजयसिंहाच्या नोकरींतून मुक्त झालों! अशा नराधमाची नोकरी करण्यापेक्षां उपाशीं मेलें म्हणून काय वाईट? क्षमा करा आम्हांला. तुम्ही क्षमा केल्यावांचून आमच्या मनाला समाधान वाटणार नाहीं.

**सुमति**—बरें! तुमच्या समाधानासाठीं मी तुम्हांला क्षमा केली, असें म्हणतों!

**किसनसिंग**—महाराजांनीं मुलांचा शोध लावील त्याला आपलें

अर्धें राज्य देण्याचें कबूल केलें आहे. त्या लोभानें आपला वध करून आपण राज्य मिळवावें, असें अजयासिंहानें ठरविलें असावें. महाराज, आपण आतां आपल्या घरीं निघून जावें. दुष्ट अजयसिंहाच्या दृष्टीस पडाल, तर तो तुमचे प्राण घेतल्यावांचून राहणार नाहीं. आम्हांला सुद्धां आतां जपूनच वागलें पाहिजे. ईश्वराची थोर कृपा म्हणूनच आज आमच्या हातून हें भयंकर पातक घडलें नाहीं.

**सुमति**—बरें, मी जातों. तुम्ही दोघेही खुशाल चला.

**मानसिंग**—नाहीं, नाहीं. अशा निर्जन रानांत आपणास सोडून आम्ही जाणार नाहीं. आपणास राज्याच्या सरहद्दीवरतीं पोंचवून मग आम्हांस कोठें जायचें असेल तिकडे आम्हीं जाऊं!

---

## प्रवेश ६ वा.

[ अजयसिंह, सुमति, किसनसिंग, आणि मानसिंग. ]

**अजयसिंह**—( सुमतीस ) कां हरामखोरा, मारेकऱ्यांना वश करून घेऊन पळून जात होतास नव्हे का? पण अजयसिंहासारख्या शूर पठ्ठयाच्या तडाख्यांतून तूं सुटून जाशील असें तुला वाटलें तरी कसें? तुला आणि तुझ्या साथीदारांना बिड्या ठोकून या बंदिखान्यांत तर आणून टाकलेंच! तुला अर्धें राज्य पाहिजे होतें ना? घे आतां अर्धें राज्य!

**सुमति**—मी राज्यलोभानें कुमाराला सोडवून आणलें होतें कीं काय, हें आपणांस पूर्वींच सांगितलें आहे. आपल्याला राज्याचा

लोभ होता, तर मला पूर्वींच सांगावयाचें होतें. म्हणजे मी कुमाराला आपल्या स्वाधीन करून निमूट चंपावतीला निघून गेलों असतों.

**अजयसिंह**—तुला निमूट जाऊं द्यायचें, म्हणजे मीच आपल्या हातानें आपल्या पायावर दगड मारून घ्यायचा, असेंच कीं नाहीं? तूं आमच्या मार्गांतला कांटा आहेस! तुला एकदां जगांतून नाहींसा केला, म्हणजे माझा मार्ग निष्कंटक होईल आणि मग मला खुशाल राज्याचा उपभोग घ्यावयास सांपडेल. तुझाच नव्हे तर तुझ्याबरोबर ह्या तुझ्या दोघां साथीदारांचाही शिरच्छेद केला, म्हणजे मी निर्धास्त होईन.

**मानसिंग**—अजयसिंह, आमचें काय पाहिजे तें करा, पण या साधु पुरुषाचा निष्कारण वध करूं नका.

**अजयसिंह**—काय साधु पुरुष! आणि त्याचा जीव घेऊं नको? बरें बरें! मोठे शहाणेच आलेत कीं नाहीं मला उपदेश करायला? गाढवांनो! असल्या अविचारानेंच तुमच्या पायांत बिड्या पडल्या आणि आतां प्राणास मुकण्याची पाळी आली आहे.

**किसनसिंग**—सांपळ्यांत कोंडलेल्या सिंहावर लहान मुलेंही दगड फेंकतात. जरा माझा हात मोकळा असता, म्हणजे दाखविलें असतें, तुला काय आहे तें! काय करूं रे? ( दांत चावतो. )

**अजयसिंह**—मर! मर! हवी तेवढी धडपड कर! तुझे आजेपणजे जरी स्वर्गांतून खालीं उतरून आले, तरी ती बिडी तुटायची नाहीं!

**सुमति**—मी तुमचा अपराधी आहें. जें काय शासन करावयाचें असेल तें मला करा; त्या बिच्याऱ्यांना कां छळतां?

**अजयसिंह**—तुला त्याची काय येवढी पंचाईत! तुझा अंतकाळ आतां जवळ आला आहे, तेव्हां तुला देवाचें नांवबिव घ्यावयाचें असेल तर घे! देवावर तुझी मोठी निष्ठा आहे म्हणे! पाहूं तुझा देव माझ्या तडाख्यांतून तुला आतां कसा सोडवतो तो?

**सुमति**—हो! हो! ईश्वरावर माझी पूर्ण निष्ठा आहे. तोच माझें संरक्षण करील. मला मरण आलें तरी 'देवा, ही तुझीच इच्छा' असें म्हणून न भितां मी मरण्यास तयार होईन. पण तुझ्यासारखीं नीच कृत्यें करण्यास केव्हांही तयार होणार नाहीं. ईश्वराच्या राज्यांत खरा न्याय आहे; शेवटीं सत्याचाच जय झाला पाहिजे.

**अजयसिंह**—होईल, होईल. शेवटीं ह्या पठ्ठ्याचाच विजय होईल, आणि तूं आपले प्राण मात्र गमावून बसशील! तुझा ईश्वर कुठें न्याय करायला येतो तो मीच पाहतों! ( जातो. )

**सुमति**—( आपल्याशीं ) देवा, तुझ्या राज्यांत न्याय नाहींच कारे? छे, छे, पण असें कसें होईल? माझ्यावर एकामागून एक संकटेंच येत गेल्यामुळें अशी कुशंका माझ्या मनांत आली. पण देवा, या योगानें तूं माझी कसोटीच पहात आहेस, असें मला वाटतें. अशा कसोटीस उतरण्याइतकें धैर्य तूं मला दे. असत्य कधीं तरी जय पावेल काय? नाहीं, नाहीं. 'सत्यमेव जयते.' अखेर सत्याचाच जय झाला पाहिजे.

---

## प्रवेश ७ वा.

[ सुमति, मोहन, किसनसिंग आणि मानसिंग. ]

**सुमति**—ते अजयसिंह थोड्या वेळापूर्वी येऊन त्रास देऊन गेले आणि हा कोण बरें त्यांनीं आणखी त्रास द्यावयाला पाठविला ? कोण बाबा तूं, आणखी कशाला आलास ?

**मोहन**—मी वेष पालटून आल्यामुळें तुम्ही मला ओखळलें नाहीं. हा आपला नम्रसेवक आणि प्रियमित्र—

**सुमति**—( आश्चर्यानें ) कोण मोहन, तूं रे इकडे कोणीकडे ? बाबा, आई, सुखरूप आहेत ना ?

**मोहन**—खुशाल आहेत. बाबा आपल्यावर व माझ्यावर प्रथमतः फारच रागावले, पण आपली सगळी हकिकत समजतांच ते फार दुःखी झाले आहेत आणि आपल्या शोधार्थ त्यांनींच मला इकडे पाठविलें आहे.

**सुमति**—पण मी इथें असल्याचें तुला सांगितलें कोणीं आणि इथें तुझा प्रवेश तरी कसा झाला ?

**मोहन**—मित्रप्रेमानें मला सारें समजलें, आणि वाघाच्या जबड्यांत त्याच प्रेमामुळें येऊन पडलों ! बरें, तें असो. पण आतां ही बोलत बसण्याची वेळ नव्हे, उशीर होतो; तर आपण हा माझा पोशाख चढवा आणि गुपचूप येथून चालते व्हा. आपल्याला कोणीही अडविणार नाहीं. मी सर्व व्यवस्था करून ठेविली आहे. चला, आटपा, एक एक क्षण लाखाचा जात आहे !

**सुमति**—काय ? येथून पळून जायचें ? आणि तुला बळी देऊन ! छे, छे, तें माझ्या हातून कालत्रयींही होणार नाहीं !

**मोहन**—तुम्ही आपला प्राण वांचविण्याची संधि गमावूं नका. माझी तुम्ही काळजी बाळगूं नका. मी येथून सुटून सुखरूपपणें तुम्हांला येऊन भेटेन. यदाकदाचित् तुमच्यासाठीं मला येथें मरण प्राप्त झालें तरी माझ्या जन्माचें सार्थकच होईल !

**किसनसिंग**—महाराज, ही सोन्यासारखी आलेली संधि फुकट दवडूं नका.

**मानसिंग**—महाराज, आतां वेळ घालवूं नका. आपण येथून लवकर निघून जाल, तर दुष्टाच्या तडाक्यांतून सुटाल. नाहींतर तो चांडाळ आपले प्राण घेतल्यावांचून कधींही सोडणार नाहीं.

**सुमति**—तुम्ही सर्वांनीं कितीही सांगितलें, तरी माझा निश्चय कालत्रयींही ढळणार नाहीं. आपल्याबद्दल दुसऱ्याच एका निरपराधी इसमाला काळाच्या जबड्यांत देऊन आपले प्राण वाचवावे असला अधमपणा माझ्या हातून कधींच होणार नाहीं. ईश्वर सत्याचा वाली आहे. तो सत्याचाच जय करील. सत्याच्या पायीं माझे प्राण गेले तरी हरकत नाहीं, पण असत्य मार्गानें चालून प्राण वांचविणें मला नको. मोहन, तूं आतां येथून निघून जा. नाहींतर माझ्यासाठीं आपल्यावरही भलतेंच एकादें संकट उपस्थित करून घेशील.

---

## प्रवेश ८ वा.

[ समरसिंह, विनयकुमार, सुमति, अजयसिंह, धनपाळ, मोहन. ]

**अजयसिंह**— महाराज, कुमाराला चोरून नेणाऱ्या ह्या चांडाळाचा आजच्या आज शिरच्छेद करावयाचा ना ?

**समरसिंह**—अजयसिंह हें काय विचारतां ? त्या नराधमाला जेवढी म्हणून कडक शिक्षा करितां येईल, तेवढी केली पाहिजे.

**विनयकुमार**—( धांवत येऊन ) पाहिलीत ही माझी चिमुकली तलवार कशी छानदार आहे ती ! मी उद्यां शिकारीस जाणार बरें का ? ( मांडीवर बसतो. )

**समरसिंह**—( चुंबन घेऊन ) बरें, बरें, जा हां शिकारीस. अरे, पण समोर हा कोण तो पाहिलास का ?

( विनयकुमार उठून सुमतीकडे धांवत जाऊन त्याला मिठी मारतो. )

**विनयकुमार**—भाऊ, कोणी हो तुम्हांला बांधलें ? तुम्ही मला सोडून कोठें गेलां होतां ?

**समरसिंह**—बाळा, याच दुष्टानें तुला येथून नेलें होतें ना ? म्हणूनच त्याच्या हातापायांत ह्या बिड्या ठोकल्या आहेत.

**विनयकुमार**—नाहीं हो नाहीं ! यांनीं तर मला सोडवून आणलें.

**समरसिंह**—म्हणजे ? काय हो अजयसिंह, कुमार म्हणतो याचा अर्थ तरी काय ?

**अजयसिंह**—( आपल्याशीं ) घात झाला ! हा कारटा इथें कशाला आला कोण जाणे ! माझी कांहीं आतां धडगत नाहीं ! ( समरसिंहास ) महाराज, कुमार भांबावून कांहींतरी बडबडतो आहे.

( इतक्यांत मोहन व धनपाल येतात. )

**मोहन**—( मोठ्यानें ओरडून ) महाराज, अन्याय करूं नका ! अन्याय करूं नका ! निरपराधी सुमतीचा प्राण घेऊं नका !

**धनपाल**—महाराज, मला पुत्रदान द्या.

**समरसिंह**—काय हो अजयसिंह, हा काय घोंटाळा आहे ?

**मोहन**—महाराज, मी सगळें सांगतों. ह्या चांडाळाचेंच हें सारें कृत्य आहे. आपल्याजवळ असलेली सारी दौलत चोरांच्या नायकास देऊन सुमतींनीं राजकुमारास सोडवून आणलें. वाटेंत ह्या अजयसिंहानें तेजसिंहाच्या मदतीनें यांना कुमारासह बोलावून नेलें. त्यांच्याशीं तो गोड गोड बोलला. पण त्या चांडाळाच्या पोटांत काळेंच होतें. म्हणून त्यानें त्यांचा खून करण्यास दोघां शिपायांस रानांत पाठविलें. त्या शिपायांनीं यांचा शिरच्छेद न करतां यांना सोडून दिलें. पण त्या तिघांनाही पकडून त्यांचा शिरच्छेद करावा म्हणजे आपणांस अर्ध्या राज्याचा उपभोग बिनबोभाट घेण्यास सांपडेल, असा घाट या पाषाणहृदयी चांडाळानें घातला आहे !

**समरसिं**—काय अजयसिंह ?

**अजयसिंह**–( कांपत कांपत ) म-हा-रा-ज अ-प-रा-धा-ची क्षमा.

**समरसिंह**—काय तुला क्षमा ? ( सुमतीजवळ येऊन ) तोडा रे यांच्या बिड्या ! महाराज, आपल्यासारख्या खऱ्या उपकारकर्त्यास आम्हीं त्रास दिला, याबद्दल क्षमा करा !

**सुमति**—महाराजांनीं कष्टी होण्याचें कांहीं कारण नाहीं. अखेर सत्याचाच जय होतो ! सत्याला केव्हांही मरण नाहीं, असा माझा दृढ विश्वास असल्यामुळें परमेश्वरावर निष्ठा ठेवून मी स्वस्थ होतों. ( धनपालास ) बाबा, मी आपल्या आज्ञेप्रमाणें वागलों नाहीं, म्हणून मला क्षमा करा !

**धनपाल**—बाळा, तूं मला भेटलास इतकेंच पुरे. खरोखरच तूं आपल्या गुणांनीं मला लाजविलें आहेस !

**समरसिंह**—आपण माझ्या अर्ध्या राज्याचे मालक तर झालांच;

पण आपली आणखी कांहीं इच्छा असेल तर ती आपण सांगावी. म्हणजे ताबडतोब मी ती पूर्ण करितों.

**सुमति**—महाराज, अजयसिंहाच्या अपराधावरून आपण त्याला जें भयंकर शासन करण्याचें योजिलें आहे, तें न करितां त्याला क्षमा करा ! एवढेंच माझें मागणें आहे. यावांचून माझी आणखी कांहीं इच्छा नाहीं.

**समरसिंह**—खरोखरच नांवाप्रमाणें आपण सुमति आहां, यांत संशय नाहीं ! प्रत्यक्ष प्राण घेणाऱ्या शत्रूवर सुद्धां उपकार ! काय हा आपला थोरपणा ! बरें, तुमच्यासाठीं मी त्याला क्षमा करितों. धनपाल, खरोखरच आपला हा पुत्र कुलदीपक आहे. यांनं जन्माला येऊन आपलें कुल धन्य केलें यांत शंका नाहीं.

**अजयसिंह**—( सुमतीचे पाय धरून ) या चांडाळावरही आपण उपकार करीत आहां, पण खरोखर तसे उपकार करण्याला मी मुळींच पात्र नाहीं.

**सुमति**—उठा अजयसिंह, आपण आपल्या मनाला उगीच वाईट वाटूं देऊं नका. शेवटीं सत्याचाच जय होतो हें नेहमीं ध्यानांत ठेवा म्हणजे झालें.



# मालेचे आश्रयदाते.

श्री. 'सावित्रीतनय,' मुंबई.
प. वा. बा. वि. गोगटे, मिठबांव.
श्री. शिवराम सखाराम शिर्के बी. ए. जळगांव.
प. वा. ग. भि. सरकार, मुंबई.
श्री. श्रीधर नारायण काकतकर, मालवण.
,, दत्तात्रय महादेव पांजरी, मुंबई.
प. वा. गणेश शिवाजी मेथर, कराची.
श्री. शिवबा यदु जानगवळी, मुंबई.
,, 'श्रीधर,' मालवण.
,, डॉ. स. वा. बागवे, एम. बी. ई. एच. एम. पी. एम. सी. एम. घाटकूपर.
,, अर्जुन गणपत मिठबांवकर, मुंबई.
,, यशवंत काशिनाथ हिंदळेकर ,,
,, यशवंत भाऊ लोके ,,
,, दुंडाप्पा ईश्वराप्पा गाडवी, पणजी.
,, भिवा बाबाजी चराटकर, मुंबई
डॉ. राजाराम वासुदेव आजगांवकर, एल्. एम्. ॲन्ड एस. मालवण.
श्री. दिनकर दत्तात्रय खांडाळेकर ,,
प. वा. रा. गो. निळेकर, मुंबई.
श्री. ना. कृ. लंगोटे. मालवण.
श्री. धाकू देवजी साठे, मुंबई.
,, भगवंत यशवंत करंगुटकर ,,
,, शंकरगौडा शिदगौडा पाटील, संकेश्वर.
,, गोपाळ राघो भोगांवकर, मालवण.
,, विठोबा येसू सडयेलकर, मुंबई.
,, दत्तात्रय गणेश आगाशे, बी. ए. एल्एल्. बी., सबजज्ज, पारनेर.
,, वासुदेव दत्तात्रय सामंत, मालवण.
,, अम्रोज कारिदाद मेंदोसा, ,,
,, गिरिधर भिवाजी नेरे, बी. ए. मुंबई.
,, शालोम राहाभीम पेणकर, ,,
,, कैतान अंतोन डिसोजा, मालवण.
,, रामचंद्र विठ्ठल परुळेकर, एम. ए. एम. ई. डी., मालवण.
,, नारायण आबाजी पेडणेकर, तळगांव.
,, रघुनाथ विष्णु कांबळी, बी. ए. एल्एल्. बी., वेंगुर्लें.
,, डॉ. विठ्ठल कान्होबा वराडकर, कट्टा.
,, सटवाजी नागाप्पा दहिहंडे, वाडी जं.
श्री. सौ. चंद्रभागाबाई गोपाळराव वराडकर, मुंबई.
,, आनंदीबाई शिवरामराव शिर्के, जळगांव.

एकदम अगर हप्त्यानें वीस रु. मालेस देणगी देणारांस मालेचे आश्रयदाते होतां येतें. आश्रयदात्यांस मालेंत प्रसिद्ध झालेलीं सर्व पुस्तकें मोफत मिळून प्रत्येक पुस्तकांत त्यांचीं नांवें प्रसिद्ध केलीं जातात.

मुद्रक–गोपाळ बळवंत जोशी, आनंद छापखाना, सदाशिव पेठ, पुणें नं. २.